सरकारी वकीलांचे कार्यालय, उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद या कार्यालयातील लघुलेखक (नि.श्रे.)- ६ व लिपिक-टंकलेखक-१८ अशा एकूण <u>२४ रिक्त पदांच्या सेवा बाह्ययंत्रणेद्वारे घेण्याबाबत</u>.

# <u>महाराष्ट्र शासन</u>

**विधि व न्याय विभाग**

**शासन निर्णय:सवऔ-२१२४/३५७/प्र.क्र.४६/१६/का.८**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई: ४०००३२.
दिनांक: २७ जून, २०२४

**वाचा:**- १) विधि व न्याय विभाग, शासन निर्णय, क्र.संकिर्ण २८१६/प्र.क्र.१९१(भाग१)/ १६/का.८, दि.१८ एप्रिल, २०२३

२) वित्त विभाग, शासन निर्णय, क्रमांक-पदनि-२०२२/प्र.क्र.१५/आ.पु.क., दि. २७ एप्रिल, २०२२

३) विधि व न्याय विभाग, शाखा-छत्रपती संभाजीनगर यांचे पत्र क्र. आस्था-२०२२/प्र.क्र.०१/२९२,दि. १४ मार्च, २०२४

**<u>प्रस्तावना</u>:-**

विधि व न्याय विभाग, शासन निर्णय, दि.१८ एप्रिल, २०२३ अन्वये कार्यासन-८ च्या अधिपत्याखालील १३ सरकारी वकील कार्यालयांच्या आस्थापनेवरील पदांचा सुधारित आकृतीबंध निश्चित करण्यात आलेला आहे. सदर सुधारित आकृतीबंधानुसार सरकारी वकीलांचे कार्यालय, उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद या कार्यालयाकरिता ७९ नियमित पदे व ३८ पदांच्या सेवा बाह्ययंत्रणेद्वारे घेण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. तसेच, गट-ड संवर्गातील पदे मृत घोषित करण्यात आलेली आहेत. सदर कार्यालयातील लघुलेखक (नि.श्रे.) या संवर्गातील पदोन्नतीच्या कोटयातील रिक्त पदावर पदोन्नती देण्याकरिता निम्नसंवर्गामध्ये लघुटंकलेखक हे पद मंजूर नाही. तसेच, लिपिक-टंकलेखक संवर्गातील पदोन्नतीच्या पदांवर पदोन्नती देण्याकरिता निम्न गट-ड संवर्गात पात्र कर्मचारी उपलब्ध नाहीत. त्यामुळे या कार्यालयातील पदोन्नतीच्या कोट्यातील लघुलेखक (नि.श्रे.)-०६ व लिपिक-टंकलेखक-१८ अशा एकूण २४ रिक्त पदांच्या सेवा बाह्ययंत्रणेद्वारे घेण्यास मान्यता देण्याची विनंती विधि व न्याय विभाग, शाखा-छत्रपती संभाजीनगर कार्यालयाने संदर्भ क्र. ३ येथील पत्रान्वये केलेली होती. सदर प्रस्तावास वित्त विभाग, शासन निर्णय, दि.९ जून २०१७ अन्वये गठित उपसमितीने चक्रीय पद्धतीने मान्यता दिलेली आहे. त्यानुसार सदर कार्यालयातील २४ रिक्त पदांच्या सेवा बाह्ययंत्रणेद्वारे घेण्याच्या प्रस्तावाला मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय:-</u>**

उपसमितीने दिलेल्या मान्यतेनुसार, सरकारी वकीलांचे कार्यालय, उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद या कार्यालयातील पदोन्नतीच्या कोट्यातील लघुलेखक (नि.श्रे.)-०६ व लिपिक-टंकलेखक-१८ अशा एकूण २४ रिक्त पदांच्या सेवा नियमित उमेदवार उपलब्ध होईपर्यंतच्या कालावधीसाठी बाह्ययंत्रणेद्वारे घेण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. बाह्ययंत्रणेद्वारे सेवा घेताना वित्त विभागाच्या संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयान्वये निर्गमित करण्यात आलेल्या मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. तसेच, बाह्ययंत्रणेकडून सेवा उपलब्ध करुन घेताना प्रचलित कायद्याचा भंग होणार नाही याची काळजी कार्यालय प्रमुखांनी घ्यावी.

३. यावर होणारा खर्च "मागणी क्र.जे-०१, लेखाशीर्ष २०१४, न्यायदान, ११४, विधि सल्लागार व समुपदेशी (००) (०१) विधि सल्लागार व समुपदेशी, (शहर अधिकारी) (दत्तमत) (अनिवार्य) १०- कंत्राटी सेवा (२०१४ ०२९९)" खाली खर्ची टाकून तो चालू सन २०२४-२०२५ च्या तसेच प्रतिवर्षीच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. वित्त विभाग, शासन निर्णय दि.०९.०६.२०१७ अन्वये गठित उपसमितीने चक्रीय पद्धतीने दिलेल्या मान्यतेनुसार, तसेच, वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. अनौसं. ३२४/आपुक, दि.४ जून २०२४ अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरुन हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असून, त्याचा सांकेतांक क्र.२०२४०६२७११४३०५४११२ असा आहे. हे आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SWATI LOHAR

Digitally signed by SWATI LOHAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT,
2.5.4.20=eaef1faf1fb5262ec7b0737903120dfa387867f017650e284f3e90868f26d12d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AB72B061785AE0359686D1C8A0DDB0F52744A155BE1924D6AB3706E1DE7E60EC, cn=SWATI LOHAR
Date: 2024.06.27 11:54:16 +05'30'

**( स्वा.सु.लोहार )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) प्रधान सचिव व विधि परामर्शी, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
२) सचिव व वरिष्ठ विधि सल्लागार, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) महालेखापाल (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
४) सह सचिव, कार्यासन-८, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) सह सचिव, विधि व न्याय विभाग, शाखा-छत्रपती संभाजीनगर.
६) सरकारी वकील, सरकारी वकील कार्यालय, उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद.
७) जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद.
८) आस्थापना अधिकारी, सरकारी वकील कार्यालय, उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद
९) कक्ष अधिकारी, विधि व न्याय विभाग (कार्यासन-२३), मंत्रालय, मुंबई.
१०) कक्ष अधिकारी, वित्त विभाग (आपुक/व्यय-५), मंत्रालय, मुंबई.
११) निवड नस्ती (कार्यासन-८).